**महाराष्ट्र शासन**

क्रमांक :-संकीर्ण-१०१० / प्र.क्र. १/२०१०/साविस
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -१३.१.२०१०.

**संदर्भ** :- शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग,क्र. एसआरव्ही- २००४ प्र.क्र.१५/ ०४ /१२,दिनांक २५ मे, २००६.

**<u>कार्यालयीन आदेश</u>**

संदर्भाधिन शासन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांच्या विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम ,२००५ प्रसारीत करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख /कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिका-यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत.तसेच विभागाशी / कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्यादृष्टीने प्रकरणे सादर करण्या-या अधिका-यांचे तीन स्तर निर्धारीत करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कक्षाशी संबंधित विषयांच्याबाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत.तथापि वरीष्ठ अधिका-यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००११३१३५४५६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(तु.वि.लव्हटे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (साविस) सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक.
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.१८ (र. व का.) / १९-अ.
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती.

कार्यालयीन आदेश क्रमांक:संकीर्ण-१०१०/प्र.क्र.१/२०१० /साविस , दिनांक १३ जानेवारी, २०१० सोबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | विभागाकडून/कार्यालयाकडून पुरविली जाणारी सेवा | सादरीकरणाचे तीन स्तर | | |
|---|---|---|---|---|
| | कार्यासनास नियत केलेले विषय | पहिला स्तर | दुसरा स्तर | तिसरा स्तर |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | प्रकल्प एकसंघ मधील योजनांचा पाठपुरावा | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव |
| २ | शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकांचे आयोजन | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(साविस) |
| ३ | सामाजिक उत्तरदायित्व अधिनियम | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(साविस) |
| ४ | सामाजिक न्याय निर्देशाक व सामाजिक न्याय अहवाल | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(साविस) |
| ५ | सामाजिक लेखा परिक्षण नियंत्रण | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(साविस) |
| ६ | नविन योजना व सकल्पनांचा समन्वय व पाठपुरावा | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव |
| ७ | सामाजिक विकास क्षेत्रातील योजना व कार्यक्रम यांचे संनियंत्रण | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव |
| ८ | माहितीच्या अधिकार अधिनियमासंबंधातील प्रकरणे | सहायक जन माहिती अधिकारी तथा कार्यासन अधिकारी | जन माहिती अधिकारी तथा अवर सचिव. | -- |
| ९ | माहितीच्या अधिकार अधिनियम (अपिल) प्रकरणे | -- | -- | अपिलीय प्राधिकारी तथा सह/उप सचिव |
| १० | विधानमंडळासंबंधीचे कामकाज | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(साविस) |
| ११ | संकीर्ण बाबी | कार्यासन अधिकारी | अवर सचिव | उप सचिव |